सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांच्या कार्यालयास सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : केव्हीबी-१२१५/प्र.क्र.२४१/उद्योग-६,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- २८ सप्टेंबर, २०१५.

वाचा : १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक-अर्थसं-२०.१५/प्र.क्र.८२/अर्थसंकल्प-३, दिनांक ३० मार्च, २०१५.

२) शासन परिपत्रक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीयुडी-२०१५/२०१५-२०१६/(९२४)/प्रशासन-१, दिनांक ०९ एप्रिल, २०१५.

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७ एप्रिल, २०१५.

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक-अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ३० एप्रिल, २०१५.

५) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.केव्हीबी-१२१५/प्र.क्र.१३९/उद्योग-६, दिनांक २१ मे, २०१५

६) महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ मुंबई यांचे क्रमांक-कार्यासन-९/रानिवि/६७५२, दिनांक २३/०७/२०१५ चे पत्र.

७) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक-अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक २८ जुलै, २०१५.

८) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.केव्हीबी-१२१५/प्र.क्र.१३९/उद्योग-६, दिनांक ११ ऑगस्ट, २०१५.

**शासन निर्णय :-**

" महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान), विधेयक, २०१५ महाराष्ट्र विधानमंडळाने मंजूर केले असून, सदर अधिनियमा महाराष्ट्र अधिनियम क्र. ९ म्हणून महाराष्ट्र शासन, राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक ३० मार्च, २०१५ मध्ये प्रसिध्द करण्यात आले असल्याचे व या अधिनियमान्वये संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना एप्रिल व मे, २०१५ या २ महिन्याकरिता करावयाच्या खर्चास अनुमती देण्यात आली आहे. त्यानुसार उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने अर्थसंकल्पिय तरतूद दिनांक ०९ एप्रिल, २०१५ च्या

परिपत्रकान्वये व वित्त विभागाने संदर्भ क्रमांक-३, ४ व ६ येथील परिपत्रकान्वये संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना सुपूर्द करण्यात आलेली आहे."

२. सन २०१५-१६ या वित्तीय वर्षाकरिता ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली रूपये २,७८,८८,०००/- (रूपये दोन कोटी अठ्ठ्याहत्तर लाख अठ्ठ्याऐंशी हजार फक्त) व ३६, सहाय्यक अनुदान (वेतन) या उद्दिष्टाखाली रूपये ४२,९९,८४,०००/- (रूपये बेचाळीस कोटी नव्व्याण्णव लाख चौऱ्यांऐंशी हजार फक्त) अशी मिळून एकूण रूपये ४५,७८,७२,०००/- (रूपये पंचेचाळीस कोटी अठ्ठ्याहत्तर लाख बहात्तर हजार फक्त) इतकी तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. त्यापैकी दिनांक ०१/०४/२०१५ ते ३१/०५/२०१५ या कालावधीतील वेतनेतर खर्च भागविण्यासाठी रूपये ४६,४८,०००/- (रूपये शेहेचाळीस लाख अठ्ठेचाळीस हजार फक्त) व वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्यासाठी रूपये ८,१९,५४,०००/- (रूपये आठ कोटी एकोणावीस लाख चौपन्न हजार फक्त) अशी एकूण रूपये ८,६६,०२,०००/- (रूपये आठ कोटी सहासष्ट लाख दोन हजार फक्त) इतके सहाय्यक अनुदान दिनांक २१ मे, २०१५ च्या शासन निर्णयान्वये व दिनांक ११ ऑगस्ट, २०१५ च्या शासन निर्णयान्वये ३६-सहाय्यक अुदान (वेतन) या उद्दीष्ठाखाली रूपये २१,९०,३४,८००/- इतकी रक्कम वित्त विभागाच्या दिनांक १७ एप्रिल, २०१५, दिनांक ३० एप्रिल, २०१५ व दिनांक २८ जुलै, २०१५ च्या परिपत्रकाच्या अनुषंगाने ७० टक्केच्या मर्यादेत जून, २०१५ ते नोव्हेंबर, २०१५ या ६ महिन्याच्या कालावधीतील वेतन व भत्ते यावरील खर्च भागविण्यासाठी वितरीत करण्यात आले आहे.

३. वित्त विभागाच्या परिपत्रक दिनांक १७/०४/२०१५, दिनांक ३०/०४/२०१५ व दिनांक २८/०७/२०१५ मधील तरतुदीनुसार आता ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली उर्वरित रक्कम रू.१,४८,७३,०००/- (अक्षरी रूपये एक कोटी अठ्ठेचाळीस लाख त्र्याहत्तर हजार फक्त) इतके सहाय्यक अनुदान ७० टक्केच्या मर्यादेत व अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर दर्शविल्याप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

४. यावरील खर्च मागणी क्रमांक के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०५ खादी व ग्रामोद्योग (००) (००) (०१) खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (दत्तमत) (२८५१ ०५८ ५) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या उद्दिष्टांखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर रक्कमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत. सदर अनुदान खर्च

झाल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र मंडळाने शासनास व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विहित कालावधीत सादर करावे. तसेच लेख्यांच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडून विचारणा करण्यात येईल, तेव्हा लेख्यासंबंधीची आवश्यक ती कागदपत्रे मंडळाने महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

६. मुख्य लेखाशिर्षाखालील उद्दिष्टनिहाय झालेला खर्च हा वरील लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा. नियंत्रक / आहरण व संवितरण अधिकारी यांनी मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करणे, शासनाची अनुमती न घेता, अन्य प्रयोजनार्थ परस्पर खर्च करणे असा वित्तीय अनियमिततेबद्दल संबंधित अधिकाऱ्यांना व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

७. महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळाने उद्दिष्टनिहाय केलेला दर महिन्याचा खर्च महालेखापाल यांच्या लेख्यांमध्ये दर्शविण्यात आलेल्या खर्चाशी तंतोतंत जुळण्यासाठी दरमहा मासिक खर्चमेळाचे काम करण्यात यावे व पडताळणी केलेल्या खर्चाचे मासिक विवरणपत्र प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत मंडळाने विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांना सादर करावेत.

८. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक १७ एप्रिल, २०१५, दिनांक ३० एप्रिल, २०१५ व दिनांक २८ जुलै, २०१५ च्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१५०९२८१६३३४२०४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vaijnath Bhujangrao Latake

Digitally signed by Vaijnath Bhujangrao Latake
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8502d8fbaa5d3d31358e5bf349fc0853019893b61049b2ad260bccf75c596136, cn=Vaijnath Bhujangrao Latake
Date: 2015.10.06 15:25:05 +05'30'

**( वै. भू. लटके )**

उप सचिव

**प्रति** :- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित :-

१. सचिव (लघु व मध्यम उद्योग), नवीन प्रशासन भवन, मुंबई.
२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई (२ प्रती)
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.

४. अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-१४/अर्थसंकल्प-३/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (उद्योग-६)